**श्रीक्षेत्र भगवानगड, जिल्हा अहमदनगर येथील पर्यटन विकास कामांना मान्यता व निधी मंजूर करण्याबाबत.**

**<u>महाराष्ट्र शासन</u>**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक :टीडीएस २०१४/१२/प्र.क्र.६९३/ पर्यटन,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक:- ५ जानेवारी, २०१५.

**संदर्भ-**१) जिल्हाधिकारी अहमदनगर यांचे पत्र क्र. जिनिस/भगवानगड/संस-५/१८४०/२०१४, दि. १२/८/२०१४.

**शासन निर्णय :**

पर्यटनस्थळांच्या ठिकाणी पायाभूत सुविधा पुरविण्यासाठी प्रादेशिक पर्यटन योजनेतंर्गत सन २०१४-१५ मध्ये रु.१९३.५०कोटी इतकी तरतूद करण्यात आली आहे. सदर तदतूदीपैकी ६० टक्के रक्कम रु.११६.०० कोटी वितरीत करावयास उपलब्ध आहे. त्यापैकी रु.४७.३० कोटी वितरीत केले असून रु.६८.८० कोटी निधीच्या तरतुदीतुन जिल्हाधिकारी, अहमदनगर यांनी दि.१२/८/२०१४ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार श्रीक्षेत्र भगवानगड जिल्हा अहमदनगर येथील खालील कामानां प्रशासकीय मान्यता देऊन रु.३.३१ कोटी इतकी रक्कम उपलब्ध करुन देण्यास शासन मंजूरी देत आहे.

**(रु.लाखात)**

| जिल्हा | कामाचे नाव | अंदाजित रक्कम | वितरीत रक्कम | कार्यन्वयीन यंत्रणा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| अहमदनगर | श्रीक्षेत्र भगवानगड येथील विकास कामे करण्याबाबत. ता. पाथर्डी | | | सार्वजनिक बांधकाम विभाग, अहमदनगर |
| १ | श्रीक्षेत्र भगवानगड येथे पिण्याच्या पाण्यासाठी टाकी बांधणे | ९८.३० | ३३१.०७ | |
| २ | श्रीक्षेत्र भगवानगड येथे अंतर्गत रस्त्याचे बांधकाम करणे | १११.८८ | | |
| ३ | श्रीक्षेत्र भगवानगड येथे जमीन सपाटीकरण करणे | ५०.२४ | | |
| ४ | श्रीक्षेत्र भगवानगड येथे पार्किग तयार करणे | ५१.९२ | | |
| ५ | श्रीक्षेत्र भगवानगड येथे (दक्षिण व पश्चिम बाजुचे) संरक्षण भिंतीचे बांधकाम करणे | १८.७३ | | |
| | एकूण | ३३१.०७ | ३३१.०७ | |

प्रादेशिक पर्यटन योजनेतंर्गत सन २०१४-१५ साठी मंजूर करण्यात आलेल्या रुपये १९३.५० कोटी एवढया तरतूदीतून शिल्लक असलेल्या निधीतून वर तक्त्यात नमूद करण्यात आलेली रक्कम रुपये ३३१.०७ लाख (रुपये तीन कोटी एकत्तीस लाख फक्त) इतकी रक्कम जिल्हाधिकारी,अहमदनगर यांना या शासन निर्णया अन्वये अदा करण्यास शासन खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून मंजूरी देत आहे .

**अटी व शर्ती :**

१. वितरीत केलेल्या निधीतून खर्च करताना वित्तीय नियमांचे आणि विविध नियमांतर्गत नेमून दिलेल्या कार्यपध्दतीचे पालन करण्यात यावे.

२. कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. मंजूर अनुदानापेक्षा जादा खर्च झाल्यास त्याची जबाबदारी जिल्हाधिकारी, अहमदनगर यांची राहील व जादा खर्च प्रित्यर्थ जादा अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

३. मंजूर तरतुदीतून करावयाचा खर्च मार्च २०१५ पर्यंत करण्यात यावा व मंजूर कामे तात्काळ पूर्ण करावीत.

४. अशा प्रत्येक योजनेबाबत करावयाच्या बांधकामासंदर्भात अथवा खरेदीबाबत किंवा सेवा पुरवठा कराराबाबत वित्तीय नियमांप्रमाणे आवश्यक ती कार्यपध्दती पाळणे आवश्यक आहे. या संदर्भात शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक-संकीर्ण-१००२/प्र.क्र.१५/कोषा-प्र५, दि. ६ फेब्रुवारी, २००२ च्या सूचनांचे काटेकोरपणे पालन होईल याची खबरदारी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने घ्यावी. तसेच शासन निर्णय वित्त विभाग क्र.बीजीटी-१०.००/प्र.क्र.५६/२०००/वित्तीय सुधारणा दिनांक १०.९.२००१ मधील उपाययोजनांची अंमलबजावणी तंतोतंतपणे करण्यात यावी.

५. तांत्रिक मान्यता विहित स्तरावर घेण्यात यावी.

६. रस्त्यांच्या प्रस्तावित कामांच्या प्रकरणांमध्ये सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियमावलीचे पालन करणे बंधनकारक राहील.

७. योजनेतर स्वरुपाच्या कामासाठी (देखभाल/दुरुस्ती इ.) सदरची तरतूद उपयोगात आणली जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

८. सदर कामांपैकी जी कामे तीर्थक्षेत्रांच्या विकासासाठी प्रस्तावित करुन देवस्थान/संस्थेच्या जागेवर करण्यात येणार आहेत अशा कामांसंदर्भात सदर देवस्थान/संस्थेकडून ना-हरकत प्रमाणपत्र प्राप्त करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच अशा कामाच्या पूर्णत्वानंतर त्या संदर्भातील देखभाल/दुरुस्ती, संबंधित संस्थेने करण्यासंदर्भात जिल्हाधिका-यांनी संबंधित देवस्थान संस्थेबरोबर करारनामा करणे बंधनकारक राहील. अशा प्रकारच्या देखभाल दुरुस्तीकरिता शासनाकडून यापुढे कोणत्याही प्रकारचा निधी उपलब्ध करुन दिला जाणार नाही याची नोंद घेण्यात यावी व तशी अट करारात अंतर्भूत करण्यात यावी. तसेच या कामामुळे निर्माण होणाऱ्या सर्व सुविधा तसेच पर्यटन स्थळ सर्व नागरिकांसाठी खुले राहील अशी अट करारात समाविष्ट करण्यात यावी.

९. सदर निधीतून होणाऱ्या खर्चातून करावयाच्या कामांची भौतिक प्रगती तसेच निधीतून होणा-या खर्चाची मासिक विवरणपत्रे दर महिन्याच्या १० तारखेपर्यात शासनास न चुकता सादर करावीत. तसेच काम पूर्ण झाल्यानंतर पूर्णत्वाचा दाखला आणि निधीबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता शासनास सादर करण्यात यावे.

१०.वर नमूद करण्यात आलेला खर्च हा सन २०१४-१५ या वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून मुख्यलेखा शीर्ष "मागणी **क्रमांक झेड्डी-४, ३४५२-पर्यटन, ०१ - पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१ पर्यटन केंद्रे (०२) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना यांना (०२) (१८) पर्यटन विकासासाठी विविध ठिकाणांसाठी मूलभूत सुविधांकरिता अनुदान (३४५२ १९५ ८) ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर)"** या लेखा शिर्षाखाली मंजुर तरतूदीमधून भागविण्यात यावा. या प्रकरणी मंजूर करण्यात आलेल्या (प्रादेशिक पर्यटन योजनेअंतर्गत) सहाय्यक अनुदानाची रक्कम आहरण करुन संबंधितांना वितरीत करण्याकरिता जिल्हा नियोजन अधिकारी, अहमदनगर यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून व जिल्हाधिकारी अहमदनगर यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी वरील निर्णयानुसार मंजूर करण्यात आलेल्या सहाय्यक अनुदानाची रक्कम कोषागार कार्यालय, अहमदनगर येथून आहरित करुन संबंधित कार्यान्वयीण यंत्रणेस वितरीत करावयाची कार्यवाही करावी.

११.हा शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभाग यांच्या सल्ल्याने व सहमतीने नियोजन विभाग अनौपचारिक संदर्भ क्र. ३/१४४४, दिनांक ३ जानेवारी, २०१५ व वित्त विभाग संदर्भ क्र.२/व्यय-१४, दि.५ जानेवारी, २०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्रमांक २०१५०११३१५२३१४६४२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Sanjay Murlidhar Bhandarkar

Digitally signed by Sanjay Murlidhar Bhandarkar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TCA, postalCode=400032, st=MAHARASHTRA, cn=Sanjay Murlidhar Bhandarkar
Date: 2015.01.27 16:22:52 +05'30'

**(सं.मु.भांडारकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रती,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. राज्यमंत्री,पर्यटन यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
४) महालेखापाल, महाराष्ट्र - २, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
५) महालेखापाल, (स्थानिक निकाय लेखापरिक्षा व लेखा), मुंबई.
६) जिल्हाधिकारी, अहमदनगर.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर.
८) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.
९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
११) नियोजन विभाग (कार्यासन-१४११/१४४४), मंत्रालय, मुंबई.
१२) वित्त विभाग (का.व्यय-१४/अर्थोपाय/अर्थसंकल्प) मंत्रालय, मुंबई.
१३) अवर सचिव पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग (अर्थसंकल्प शाखा), मंत्रालय, मुंबई.
१४) निवड नस्ती, कार्यासन-पर्यटन.